**श्री.रविकुमार गजानन पराते यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १११६/(प्र.क्र.१२५/२०१६)/आ(वर्ग-१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०९ मे, २०१७

**वाचा :-**

(१) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.नियुक्ती १०००/ (२८/२०००)/ आ (संनि), दि.२०.५.२०००
(२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.नियुक्ती १०००/ (२८/२०००)/ आ (संनि), दि.९.१०.२००६
(३) शासन आदेश क्र.एसएलएस ११०७/ (२८१/ २००७)/ आ (वर्ग-१), दि.१.११.२००७
(४) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे रिट याचिका क्र.२७५७/२००२ मधील दि.१९.४.२००५ रोजीचे आदेश
(५) मा.सर्वोच्च न्यायालय येथील विशेष अनुज्ञा याचिका क्र.१९९९२/२०१५.

**प्रस्तावना :-**

श्री.र.ग.पराते यांची संदर्भ क्र.१ अन्वये दि.२०.५.२००० च्या शासन निर्णयान्वये सहायक कार्यकारी अभियंता या पदावर त्यांच्या जातीदावा पडताळणीच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तात्पुरती व सशर्त स्वरुपात नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार श्री.पराते हे सहायक कार्यकारी अभियंता या पदावर दि.१/७/२००० रोजी रुजू झाले आहेत. श्री.पराते यांचा “हलबा” या जातीचा दावा अनुसूचित जमाती जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, नागपूर यांनी अवैध ठरविला व कार्यकारी दंडाधिकारी, मोहाडी जि.भंडारा यांनी श्री.पराते यांना दि.२२/२/१९८८ रोजी दिलेले अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र रद्द केले. त्यामुळे श्री.पराते यांनी जातीदावा अवैध ठरविलेल्या जातप्रमाणपत्र पडताळणीच्या निर्णयाविरुध्द मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठात रिट याचिका क्र.२७५७/२००२ दाखल केली.

२. मा. उच्च न्यायालयाने या याचिकेवर अंतिम निर्णय होईपर्यंत जात प्रमाणपत्र पडताळणी समितीच्या आदेशाला स्थगिती दिली, त्यामुळे श्री.पराते यांची सशर्त नियुक्ती तशीच पुढे चालू राहिली. त्यानंतर मा.उच्च न्यायालयाने दि.१९/४/२००५ रोजी श्री.पराते यांची सहायक कार्यकारी अभियंता या पदावरील नियुक्ती मिलिंद कटवारे प्रकरणातील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने अबाधित राहील असे निदेश दिले. तसेच यापुढे श्री.पराते स्वत:, त्यांची पत्नी व मुले यांना अ.ज. प्रवर्गाचे लाभ प्राप्त होणार नाहीत असे स्पष्ट करुन या अटीवर त्यांची सेवा संरक्षित करण्याचा निर्णय

दिला व त्यानुसार श्री.पराते यांची कोर्टासमोर शपथपत्रही दाखल केले. त्यानंतर मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार श्री.पराते यांची सहायक कार्यकारी अभियंता पदावरील नियुक्ती दि.९/१०/२००६ च्या शासन निर्णयान्वये नेमणूकीच्या दिनांकापासून (दि.१.७.२००० पासून) अनुसूचित जमाती प्रवर्गाऐवजी खुल्या प्रवर्गातून नियमित करण्यात आली असून दि.२०/५/२००० च्या शासन निर्णयातील सशर्त नियुक्तीची अट वगळण्यात आली आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५/६/१९९५ च्या शासन निर्णयानुसार तसेच सर्वोच्च न्यायालयातील मिलिंद कटवारे विरुध्द महाराष्ट्र शासन मध्ये झालेल्या मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या आधारे श्री.र.ग.पराते व इतर ८ कर्मचा-यांना दिलेल्या नियुक्त्या/संरक्षण संविधानिकदृष्टया योग्य आहे किंवा कसे याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभाग व विधी व न्याय विभागाचे अभिप्राय घेण्यात आले आहेत. सामान्य प्रशासन विभागाने “विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायानुसार सेवा संरक्षित करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे, त्यामध्ये बदल करणे योग्य ठरणार नाही,” असे अभिप्राय दिले आहेत. तर विधी व न्याय विभागाने यासंदर्भातील अनेक न्यायालयीन प्रकरणांचा उदापोह करुन दि.१५/६/१९९५ पर्यंतच्या नियुक्त्यांना शासन सेवेत संरक्षण अनुज्ञेय असून दि.१५/६/१९९५ नंतरच्या नियुक्त्यांना शासन सेवेत संरक्षण अनुज्ञेय नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. तसेच मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने हलबा कोष्टी प्रवर्गासंबंधी दि.२२/१२/२०१४ रोजी निर्णय दिला असून त्यानुसार दि.२८/११/२००० पर्यंतच्या नियुक्त्यांना संरक्षण प्राप्त होते. तथापि, सदर निर्णयाविरुध्द आदिवासी विकास विभागाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका दाखल केली असून सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

४. श्री.पराते यांची दि.२०/५/२००० च्या आदेशान्वये म्हणजेच दि.१५/६/१९९५ नंतर सहायक कार्यकारी अभियंता पदावर नियुक्ती झाली आहे. त्यामुळे विधी व न्याय विभागाचे अभिप्राय विचारात घेता त्यांना शासन सेवेत संरक्षण मिळाले तरी सहायक कार्यकारी अभियंता पदावर ज्येष्ठता प्राप्त होणार नाही. तथापि, मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने हलबा कोष्टी प्रवर्गासंबंधी दि.२२/१२/२०१४ रोजी दिलेल्या निर्णयानुसार दि.२८/११/२००० पर्यंतच्या नियुक्त्यांना संरक्षण प्राप्त होते. तसेच, आदिवासी विकास विभागाने मा.सर्वोच्च न्यायालयात या निर्णयाविरुध्द विशेष अनुज्ञा याचिका दाखल केली असली तरी मा.उच्च न्यायालयाच्या दि.२२/१२/२०१४ रोजीच्या आदेशास स्थगिती देण्यात आलेली नाही, ही वस्तुस्थिती आहे.

५. आता, सहायक कार्यकारी अभियंता संवर्गात श्री.र.ग.पराते यांना खुल्या प्रवर्गातून सेवा कनिष्ठ असलेले श्री.सु.पां.कुशिरे यांना सन २००५ च्या निवडसूचीतून सहायक कार्यकारी अभियंता पदावरुन कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावर दि.११.४.२००५ च्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली असून श्री.कुशिरे यांचा कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक ११.४.२००५ असा आहे. यास्तव, श्री.पराते यांना खुल्या प्रवर्गातून सेवाकनिष्ठ असलेले अधिकारी श्री.कुशिरे यांचा कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा दि.११.४.२००५ हा मानीव दिनांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, मा.उच्च न्यायालयाने श्री.र.ग.पराते यांचे प्रकरणी दि.१९.४.२००५ रोजी (मा.उच्च न्यायालय, नागपूर रिट याचिका क्र.२७५७/२००२) दिलेले आदेश, तसेच मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.१९९९२/२०१५ मधील अंतरिम/अंतिम निर्णयाच्या अधीन राहून श्री.र.ग.पराते यांना श्री.सु.पां.कुशिरे यांचा कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचा दि.११.४.२००५ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात येत आहे. तसेच, त्यांची नेमणूक अनुसूचित जमातीऐवजी खुल्या प्रवर्गातून नियमित करण्यात येत असून त्यांना अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचे शासन सेवेत असलेले कोणतेही लाभ देय होणार नाहीत.

२. श्री.पराते यांना कार्यकारी अभियंता पदावरील दि.११.४.२००५ हा मानीव दिनांक केवळ ज्येष्ठतेसाठी प्रदान केलेला असून मानीव दिनांक मंजूरीच्या अनुषंगाने श्री.पराते यांची दि.११.४.२००५ ते दि.३१.१०.२००७ या कालावधीची काल्पनिक वेतन निश्चिती करून वेतन निश्चितीचा प्रत्यक्ष लाभ दि.१.११.२००७ पासून अनुज्ञेय राहील. मात्र, मानीव दिनांक मंजूरीच्या अनुषंगाने थकबाकीची रक्कम त्यांना अनुज्ञेय रहाणार नाही.

३. हे आदेश संबंधित वर्षाच्या निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता प्राप्त होण्याच्या अधीन तसेच, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८५/२०१७, दि.२२.३.२०१७ व वित्त विभाग (सेवा-३) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६१/ २०१७, दि.१८.४.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०५०९११३०२७४७२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.09 12:11:18 +05'30'

**वि.का.चौधरी**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. प्रधान सचिव (जसंवि) / सचिव (लाक्षेवि)/ सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व महासंचालक/ कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

३. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मुख्य अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
५. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
६. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (सेवा-३), मंत्रालय, मुंबई.
१०. संबंधित अधिकारी.
११. कार्यासन आ (वर्ग-१) संग्रहार्थ.